राज्यातील राज्य शासकीय/निमशासकीय/ महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांना शासकीय नोक-यांमध्ये भरती करण्यासंबंधी आढावा घेणे व त्यानुषंगाने प्रभावी उपाययोजना सूचविण्यासाठी मा. मंत्री, वित्त यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीस अहवाल सादर करण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : अकंपा -१२१५/प्र.क्र. १२७ (अ) /आठ
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ जुलै, २०१७.

संदर्भ- (१) शासन निर्णय क्रमांक-अकंपा-१२१५/प्र.क्र. १२७/आठ, दिनांक २० जून, २०१५
(२) शासन निर्णय क्रमांक-अकंपा-१२१५/प्र.क्र. १२७(अ)/आठ, दिनांक १५ ऑक्टोबर, २०१५
(३) शासन निर्णय क्रमांक-अकंपा-१२१५/प्र.क्र. १२७(अ)/आठ, दिनांक २० ऑगस्ट, २०१६
(४) शासन निर्णय क्रमांक-अकंपा-१२१५/प्र.क्र. १२७(अ)/आठ, दिनांक ३० जानेवारी, २०१७

प्रस्तावना :-

राज्यातील राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी अनुकंपा नियुक्तीबाबतचा सुधारीत प्रस्ताव दिनांक ९/६/२०१५ रोजी मंत्रीमंडळासमोर विचारार्थ सादर केला असता शासनाने सदर प्रकरणी राज्यातील राज्य शासकीय कर्मचा-यांबरोबरच नगरपालिका, महानगरपालिका, जिल्हा परिषदा, महामंडळे इ. मधील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी सध्याचे अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांना किंवा त्यांच्या वारसांना शासकीय सेवेत सरळसेवेने नियुक्ती देण्यासंबंधी प्रभावी उपाययोजना सुचविण्याबाबत मा. मंत्री, वित्त महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती स्थापन करावी. उपसमितीने या विषयाचा अभ्यास करुन पुढील कार्यवाहीचा अहवाल २ महिन्यात सादर करण्यात यावा, असे निदेशित केले होते. त्यानुसार राज्यातील राज्य शासकीय/ निमशासकीय/ महामंडळे अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांकरिता प्रभावी उपाययोजना सुचविण्यासाठी संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली. संदर्भाधीन क्र. (२), (३) व (४) येथील शासन निर्णयान्वये मंत्रीमंडळ उपसमितीस अहवाल सादर करण्यास अनुक्रमे ३१.१२.२०१५, दि. ३०.११.२०१६ व दि. ३१.०५.२०१७ पर्यंत व मुदतवाढ देण्यात आली होती. मंत्रीमंडळ उपसमितीस अहवाल सादर करण्यास आणखी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्या अनुषंगाने शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय -

राज्यातील राज्य शासकीय/निमशासकीय/ महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी अनुकंपा धोरण सुधारणे आणि त्याचबरोबर प्रकल्पग्रस्तांना शासकीय नोक-यांमध्ये भरती करण्यासंबंधी

आढावा घेणे व त्यानुषंगाने प्रभावी उपाययोजना सूचविण्यासाठी मा. मंत्री, वित्त यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमितीस अहवाल सादर करण्यास दि. ३०.११.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१२१६३०१३६९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Pandurang Wagh

Digitally signed by Rajendra Pandurang Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=UNDER SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, serialNumber=7adb1868a49b8719e27d3453044671a8ceddbd04af26dd2089ed03e6b1bd92bd, cn=Rajendra Pandurang Wagh
Date: 2017.07.12 16:27:29 +05'30'

( राजेंद्र वाघ )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री, वित्त व नियोजन व वने यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, क्रिडा व युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण, मराठी भाषा, सांस्कृतीक कार्य, अल्पसंख्याक व वक्फ यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, अन्न व औषध प्रशासन, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य आणि कुटूंब कल्याण यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्विय सहायक
८) अपर मुख्य सचिव, (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक
९) अपर मुख्य सचिव, (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१०) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
११ ) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१२) प्रधान सचिव, (नगरविकास २), नगर विकास विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१३) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१४) सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१६अ), यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१५) सचिव, (पंचायत राज व ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे वरिष्ठ स्विय सहायक
१६) निवड नस्ती/का-८.